द कॉनफिडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्री (CII) या संस्थेद्वारे दिनांक २४ व २५ जानेवारी २०११ रोजी ग्रँट हयात येथे होणाऱ्या १७ व्या पार्टनरशिप समेट (भागीदारी परिषद), २०११ मधील ओमान राष्ट्राच्या सांस्कृतिक कार्यक्रमास करमणूक शुल्क माफी मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : ईएक्सएम- २०११/प्र.क्र. १८ /टी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० एप्रिल, २०११.

**शासन निर्णय :-**

मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ च्या कलम ६(३) अनुसार प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन, **"द कॉनफिडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्री** (CII)" या संस्थेद्वारे दिनांक २४ व २५ जानेवारी,२०११ रोजी ग्रँट हयात, मुंबई उपनगर जिल्हा येथे आयोजित केलेल्या " १७ व्या पार्टनरशिप समेट (भागीदारी परिषद), २०११" या कार्यक्रमा दरम्यान झालेल्या सांस्कृतिक कार्यक्रमास पुढील शर्तींच्या अधीन राहून **करमणूक शुल्कमाफी देण्यात येत आहे :-**

**( अ)** (१) सदर कार्यक्रम प्रायोजित केला असल्याने, प्रायोजकत्वाची रक्कम ही मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम २ (ग-३) मधील तरतूदींनुसार प्रवेशमूल्य मानण्यात येते व अशा प्रायोजकत्वाच्या रकमेवर कलम ३ (१) (क) मध्ये विहित केलेल्या दराने करमणूक शुल्क देय होतो.

(२) संस्थेने सक्षम प्राधिकाऱ्यांकडून वरील कार्यक्रमासाठी आवश्यक मान्यता मिळविल्यानंतर, सदर कार्यक्रम विनाशुल्क असल्याने या कार्यक्रमा करिता प्रायोजकत्वाच्या रक्कमेबाबत जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांना आगाऊ कळविली असेल तसेच त्यानुसार देय अनामत रक्कम अथवा याबाबतचे बंधपत्र जिल्हाधिकाऱ्यांकडे जमा केले असेल, तसेच जिल्हाधिकाऱ्यांनी प्रायोजकत्वाच्या रक्कमेस मान्यता दिली असेल.

(३) सदर कार्यक्रमाकरिता प्राप्त झालेली प्रायोजकत्वाची रक्कम सदर परिषद तसेच या दरम्यान होणा-या ओमान राष्ट्राच्या सांस्कृतिक कार्यक्रमाकरिता खर्च करणे आवश्यक आहे.

(४) सीसीआय, मुंबई या संस्थेने वरील कार्यक्रमापासून मिळालेल्या सर्व उत्पन्न व खर्च यांचा यथार्थ हिशोब उपरोक्त शर्त क्रमांक-२ मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे केला असल्याबाबत, कार्यक्रमाची व्यवस्था पाहण्यास जबाबदार असलेल्या व्यक्तीने कार्यक्रमाच्या तारखेपासून (दिनांक २६ जानेवारी, २०११ पासून) तीन महिन्याच्या आत जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांच्याकडे सादर करावा.

(५) कार्यक्रमावरील खर्च वजा केल्यानंतर मिळालेली संपूर्ण रक्कम ही वरील शर्त (दोन) मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या प्रयोजनासाठी वस्तुतः वापरली नसेल, याबद्दल जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांची खात्री झाल्यास, अशा व्यक्ती करवी योग्य ती करमणूक शुल्काची रक्कम भरण्यास जबाबदार असल्याचे समजण्यात येईल.

(६) कार्यक्रमाच्या आयोजनापासून मिळालेल्या रकमेमधून कार्यक्रमावरील खर्चाची रक्कम वजा केल्यास ती रक्कम एकुण रकमेच्या २० टक्क्यांपेक्षा अधिक होणार नाही याची दक्षता घेण्यात आली असेल.

(७) वर विनिर्दिष्ट केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही करमणूकीच्या/ प्रदर्शनाच्या बाबतीत या आदेशाचा वापर केला जाणार नाही. या आदेशात कोणत्याही प्रकारची दुरुस्ती किंवा फेरबदल करण्यात येणार नाही.

(८) हया आदेशामध्ये घालून दिलेल्या कोणत्याही शर्तीचे ठरवून दिलेल्या वेळेत पालन करण्यात कसूर केल्यास जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांनी संस्थेकडून अधिनियमातील तरतुदीन्वये विहीत दराने करमणूक शुल्क वसूल करावे. तसेच मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ आणि तदांतर्गत विहित केलेल्या नियमांच्या तरतुदींनुसार कार्यक्रमाच्या आयोजकांविरुध्द खटला दाखल करावा.

**(ब)** वर उल्लेखिलेल्या शर्ती पूर्ण होत आहेत याची जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांनी दक्षता घ्यावी आणि मिजवॉन वेलफेअर सोसायटी, मुंबई या संस्थेने आयोजित केलेल्या उपरोक्त कार्यक्रमापासून झालेल्या करमणूक शुल्काच्या हानीबाबतची माहिती कार्यक्रमाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाला सादर करावी.

३. सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.३९/११/व्यय-९ , दिनांक १.२.२०११ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०४३०१७०६५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( विद्या हम्पय्या )**
**शासनाचे अवर सचिव,**

**प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी ,**

**जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई.**

**प्रत माहितीसाठी,**

**प्रधान सचिव ( उद्योग)उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.**

**संचालक, द कॉनफिडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्री (CII), मुंबई**

**प्रत,**

प्रधान महालेखापाल (लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
निवडनस्ती टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.